**विधि व न्याय विभागांतर्गत कार्यालयीन इमारतींचे बांधकाम करणे व न्यायालयांना पायाभूत सुविधा पुरविणे अशी नवीन सुधारीत राज्यस्तरीय योजना अंमलात आणणे.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग,**
**शासन निर्णय क्र.संकीर्ण-१६२४/प्र.क्र.१०६/का-१३,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : ७ मार्च २०२५

**वाचा :-** विधि व न्याय विभाग, शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-१६२३/प्र.क्र.१३७/का-१३ दिनांक १५ मार्च २०२४

**प्रस्तावना:-**

राज्यामध्ये "न्यायालयांना पायाभूत सुविधा पुरविणे" ही केंद्र पुरस्कृत योजना राबविण्यात येत आहे. सदर योजनेअंतर्गत न्यायालयीन इमारती व न्यायाधीश निवासस्थाने यांची बांधकामे करण्यात येत आहेत. परंतु प्रगतीत असलेल्या न्यायालयीन इमारती व न्यायाधीश निवासस्थानांच्या बांधकामाचे दायित्व अधिक असल्याने, आर्थिक वर्षात प्राप्त झालेला केंद्रीय हिस्सा ६०% व समरुप राज्य हिस्सा ४०% याप्रमाणापेक्षा, जास्त राज्य हिस्सा खर्ची पडत आहे, त्यामुळे केंद्र पुरस्कृत योजनेच्या प्रमाणाचे ६०:४० असा समतोल राखता येत नाही. तसेच मा.उच्च न्यायालयाच्या इमारती व मा.उच्च न्यायालयांचे न्यायमुर्ती यांच्या निवासस्थानांच्या बांधकामाकरीता वेगळी योजना कार्यान्वित नाही, सबब, न्यायालयीन इमारती व न्यायाधीश निवासस्थानांच्या बांधकामाकरीता राज्य योजना असणे आवश्यक बनले आहे.

उपरोक्त वाचा येथील शासन निर्णयान्वये, सद्य:स्थितीत कार्यान्वित असलेली "विधि व न्याय विभागांतर्गत कार्यालयीन इमारतींचे बांधकाम करणे" या राज्य योजनेमध्ये "न्यायालयीन इमारती व न्यायाधीश निवासस्थानांची बांधकामे" हा विषय अंतर्भूत करुन "विधि व न्याय विभागांतर्गत कार्यालयीन इमारतींचे बांधकाम करणे व न्यायालयांना पायाभूत सुविधा पुरविणे" अशी सुधारीत राज्य योजनेचा प्रस्ताव मंत्रिमंडळाच्या दिनांक २० मार्च, २०२५ रोजी झालेल्या बैठकीत मान्यतेसाठी सादर करण्यात आला. सदर योजनेस मंत्रिमंडळाने मान्यता प्रदान केली आहे. त्यानुसार खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

"विधि व न्याय विभागांतर्गत कार्यालयीन इमारतींचे बांधकाम करणे व न्यायालयांना

पायाभूत सुविधा पुरविणे" अशी सुधारीत राज्य योजना खालीलप्रमाणे अंमलात आणण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे :-

१. **योजनेचा उद्देश :-** विधि व न्याय विभागांतर्गत कार्यालयीन इमारतींचे बांधकाम करणे व न्यायालयांना पायाभूत सुविधा पुरविणे हा या योजनेचा उद्देश असेल.

२. **योजनेअंतर्गत समाविष्ट कामे :-**

१) नवीन कार्यालयीन इमारतींचे बांधकाम करणे.
२) कार्यालयीन इमारतीचे नुतनीकरण व संरचनात्मक दुरुस्ती करणे.
३) राज्यातील मा.उच्च न्यायालय व खंडपीठे, जिल्हा व तालुका न्यायालयांच्या नवीन इमारतींची बांधकामे व अनुषंगीक कामे करणे.
४) राज्यातील मा.उच्च न्यायालयाचे न्यायमुर्ती, जिल्हा व तालुका न्यायालयांचे न्यायाधीश व कर्मचारी यांच्या निवासस्थानांच्या नवीन इमारतींची बांधकामे व अनुषंगिक कामे करणे.
५) न्यायालयीन इमारती व न्यायाधीश निवासस्थाने यांच्या इमारतीचे नुतनीकरण व संरचनात्मक दुरुस्ती, अशी मोठया स्वरुपाची कामे करणे

३. **योजनेसाठी नियतव्ययाची उपलब्धतता :-**

सदर योजना राज्य कार्यक्रमांतर्गत प्रस्तावित करण्यात येत आहे. नियोजन विभागाकडून, प्रत्येक वित्तीय वर्षामध्ये कार्यक्रमांतर्गत योजनांना प्राप्त होणाऱ्या नियतव्ययामधून, सदर योजनेकरीता नियतव्यय उपलब्ध करुन घेण्यात येईल.

४. **योजनेअंतर्गत करण्यात येणारी बांधकामे व लेखाशीर्ष:-**

४.१ कार्यालयीन इमारतीच्या बांधकामाकरीता नवीन लेखाशीर्ष सार्वजनिक बांधकाम विभागाच्या मागणी क्रमांक एच-८ "सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च - ४०५९३२२३" अंतर्गत निर्माण करण्यात आलेले आहे. सदर लेखाशीर्ष "कार्यालयीन इमारतींच्या बांधकामांच्या तरतूदीकरीता" व "न्यायालयीन इमारती, नुतनीकरण, संरचनात्मक दुरुस्ती व अनुषंगीक बांधकामे" यांच्या तरतूदीकरीता उपयोगात आणण्यात येईल.

४.२ न्यायाधीश निवासस्थाने, नुतनीकरण, संरचनात्मक दुरुस्ती व इतर अनुषंगिक कामे यांच्या बांधकामांकरीता स्वतंत्र व नवीन लेखाशीर्ष सार्वजनिक बांधकाम विभागाच्या लेखाशीर्षांतर्गत निर्माण करण्यात येईल.

४.३ प्रस्तावित सुधारीत योजनेअंतर्गत करण्यात येणारी बांधकामे सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत विहीत कार्यपध्दतीनुसार करण्यात येतील.

५. **इमारतींच्या बांधकामाकरीता उपलब्ध करावयाची जागा** :-

कार्यालयीन इमारती, न्यायालयीन इमारती व न्यायाधीश निवासस्थाने यांच्या बांधकामाकरीता, आवश्यकतेप्रमाणे शासनाकडे मागणी करण्यात येईल.

६. **इमारतींची देखभाल दुरुस्ती :-**

शासकीय इमारतींची देखभाल दुरुस्ती सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत करण्यात येत आहेत. त्यानुसार प्रस्तावित योजनेअंतर्गत बांधण्यात येणाऱ्या इमारतींची देखभाल व दुरुस्ती सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत करण्यात येईल.

७. **केंद्र पुरस्कृत योजनेअंतर्गत सद्य:स्थितीत सुरु असलेल्या बांधकामांची विभागणी :-**

७.१ नवीन राज्य योजना कार्यान्वित झाल्यानंतर, सद्य:स्थितीत केंद्र पुरस्कृत योजनेअंतर्गत सुरु असलेल्या बांधकामांची विभागणी "केंद्र पुरस्कृत योजनेअंतर्गत करावयाची कामे" व "राज्य योजनेतून करावयाची कामे" अशी करण्यात येईल. त्या-त्या आर्थिक वर्षात प्राप्त होणारा केंद्रीय निधी व राज्य निधी लक्षात घेऊन, त्या-त्या आर्थिक वर्षाच्या सुरुवातीस सदर केंद्र पुरस्कृत योजनेमधून कोणती कामे घ्यावयाची व राज्य योजनेतून कोणती कामे घ्यावयाची याची निश्चिती करण्यात येईल.

७.२ केंद्र पुरस्कृत योजनेअंतर्गत करावयाच्या कामांची निश्चिती झाल्यावर, इतर प्रगतीत असणाऱ्या सर्व न्यायालयीन इमारतींच्या बांधकामांना व न्यायाधीश निवासस्थानांच्या बांधकामांना राज्य योजनेमधून निधी उपलब्ध करुन देण्यात येईल.

७.३ परंतु आर्थिक वर्षात केंद्र पुरस्कृत योजनेत अंतर्भूत असलेल्या बांधकामांस आवश्यकता पडल्यास, प्रस्तावित राज्य योजनेच्या लेखाशीर्षाअंतर्गतसुध्दा विभागास्तरावरुन निधी उपलब्ध करुन देण्यात येईल.

८. **योजनेची अंमलबजावणी :-**

८.१ कार्यालयीन इमारतींची बांधकामे, प्रचलित शासन निर्णय, नियम व कार्यपध्दतीनुसार करण्यात येतील.

८.२ न्यायालयीन इमारती, न्यायाधीश निवासस्थाने व अनुषंगिक बांधकामे :- विधि व न्याय विभाग, शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-१६१५/प्र.क्र.२२०/भाग-१/का-१३, दिनांक १० ऑक्टोबर २०१६ अन्वये राज्यातील न्यायालयांना सोयी-सुविधा उपलब्ध करुन देण्याच्या अनुषंगाने "न्यायालयांकरीता पायाभूत सुविधा धोरण" निर्गमित करण्यात आलेले आहे. सदर धोरणामध्ये न्यायालयीन इमारती व न्यायाधीश निवासस्थाने यांच्या प्रकल्पांची आखणी

करण्यापासून ते सदर प्रकल्प पूर्ण होईपर्यंत सविस्तर कार्यप्रणाली विषद करण्यात आली आहे. सदर बांधकामे करतांना सदर कार्यप्रणालीचा अवलंब करण्यात येईल.

९. सदर शासन निर्णय मा.मंत्रिमंडळाच्या दिनांक २० मार्च २०२५ रोजी झालेल्या बैठकीत प्राप्त झालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२५०४०७१६१८२५१०१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

VILAS VASANT GAIKWAD

Digitally signed by VILAS VASANT GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, 2.5.4.20=64f5ab9e019c90ad5db684984df113ed09062245cb9e042be5b12e5aa482fc17, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CD7BB8BAA2D72280DD453A12422482D4768A126C83ECB44E84A8186EED4352A0, cn=VILAS VASANT GAIKWAD
Date: 2025.04.07 16:21:03 +05'30'

**( विलास वसंत गायकवाड )**
**विधी सल्लागार-नि-सह सचिव, महाराष्ट्र शासन,**

**प्रति,**

१) मा.राज्यपालांचे सचिव
२) मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
३) सर्व मा.मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक
४) मा.सभापती, विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५) मा.अध्यक्ष, विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
६) मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
७) मा.महाधिवक्ता, महाराष्ट्र राज्य, मुंबई
८) मा.महाप्रबंधक, मा.उच्च न्यायालय , मुंबई.
९) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय,मुंबई
१०) अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, नियोजन विभाग, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
११) मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक.
१२) प्रधान सचिव व विधि परामर्शी, विधि व न्याय विभाग यांचे वरिष्ठ स्वीय सहायक.
१३) उपसचिव (वित्त)/उपसचिव (नियोजन)/उपसचिव (इमारती)(सा.बां.वि.), मंत्रालय, मुंबई.
१४) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, सर्व
१५) मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१६) सहउपसचिव/ / कार्यासन अधिकारी, विधि व न्याय विभागातील सर्व कार्यासने.
१७) निवडनस्ती / संग्रहार्थ कार्यासन-१३